कण्हेर प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्हयातील पंढरपूर तालुक्यातील पिराची कुरोली या पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांना निधी उपलब्ध करुन देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०२०/१८१/प्र.क्र.७०/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १३ नोव्हेंबर, २०२०

वाचा -

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/४/२०१५
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६/०४/२०२०
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१९/३७६/प्र.क्र.९७/र-८, दि.१६.९.२०१९
६) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१९/३७९, ३७७/प्र.क्र.९०/र-८, दि.२०.९.२०१९
७) अधीक्षक अभियंता,भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांचे पत्र क्र.भीकामं/लेखा/३०७८/ सन २०२०, दि.१८.९२०२०
८) महसूल व वन विभाग शासनपत्र क्र.अर्थसं-२०२०/१८१/प्र.क्र.९०/र-८, दि.२०.९.२०२०
९) कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र.८, सोलापूर यांचे पत्र क्र.उकावि.८/ले.३/ ४३०५/२०२०, दि.२७.१०.२०२०

प्रस्तावना-

कण्हेर प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्हयातील पंढरपूर तालुक्यातील पिराची कुरोली या पुनर्वसित गावामधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र.५ व ६ येथील आदेशान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर नागरी सुविधा कामांसाठी यापूर्वी निधी वितरित करण्यात आलेला नाही. सदर कामांपैकी प्रगतीपथावरील असलेल्या नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी निधी मागणी प्रस्ताव प्रकल्पयंत्रणेने शासनास सादर केला आहे.

२. त्यानुसार, कोविड-१९ च्या संसर्गजन्य रोगाच्या प्रादुर्भावाच्या पार्श्वभूमीवर वित्तीय उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने, प्रकल्पयंत्रणेने सादर केलेल्या प्रस्तावातील पूर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांकरिता काही प्रमाणात निधी उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधिन आहे.

शासन निर्णय-

त्यानुसार, कण्हेर प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्हयातील पंढरपूर तालुक्यातील पिराची कुरोली या पुनर्वसित गावठाणामधील प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामासाठी एकूण रु.२८,९१,०००/- एवढा निधी सन २०२०-२०२१ या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, कण्हेर प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्हयातील पंढरपूर तालुक्यातील पिराची कुरोली या पुनर्वसित गावामधील प्रगतीपथावरील खालील तक्त्यात नमूद नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु.२८,९१,०००/- (अक्षरी रुपये अठ्ठावीस लक्ष एक्क्याण्णव हजार फक्त) एवढा निधी "मागणी क्र. सी-१०, ४७०१-मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, (००) (०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, पुणे यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | पुनर्वसित गावाचे नांव | नागरी सुविधा कामांचा तपशील | वितरित निधी (रुपये) |
|---|---|---|---|
| १. | पिराची कुरोली | पिण्याची पाण्याची खुली विहीर बांधणे | ९,००,०००/- |
| २. | पिराची कुरोली | दोन खोली शाळा बांधणे | ६,९०,०००/- |
| ३. | पिराची कुरोली | उघडी गटाराचे बांधकाम | ५,३०,०००/- |
| ४. | पिराची कुरोली | डांबरी पोहोच रस्ता कि.मी.०/० ते १/० | ३,७३,०००/- |
| ५. | पिराची कुरोली | डांबरी पोहोच रस्ता कि.मी.१/० ते २/० व त्यावरील बांधकामे | ३,९८,०००/- |
| | | **एकूण -** | **२८,९१,०००/-** |

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, पुणे यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणूनसंबंधित अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांनी नागरी सुविधा व तदनुषंगिक कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीयआयुक्त,पुणे यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजुरी घेण्याची आवश्यकतानाही.

४) कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र.८, सोलापूर यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, पुणे तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांना सत्वर सादर करावा

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी .

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्ष "मागणी क्र. सी-१०, ४७०१-मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, (००) (०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत)" या अंतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account / PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्ष "मागणी क्र. सी-१०, ४७०१-मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, (००) (०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत)" या अंतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्य लेखाशीर्ष "मागणी क्र. सी-१०, ४७०१-मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१, (००) (०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत)" या अंतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

११) संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र UtilisationCertificate महालेखापाल कार्यालय,संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

१२) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२०-२०२१ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक: अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ०४ मे, २०२० नुसार वित्त विभागाशी सल्लामसलत करण्यात आला असून, वित्त विभागाने प्रस्तुत योजनेखाली निधी वितरित करण्यास अनौ.संदर्भ क्रमांक २६८/२०२०, दि.१३.१०.२०२० नुसार सहमती दर्शविली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११३१३३७४२९६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand Shankarappa Munjale

Digitally signed by Dayanand Shankarappa Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand Shankarappa Munjale
Date: 2020.11.13 13:40:37 +05'30'

**( दयानंद शं. मुंजाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन), पुणे विभाग, पुणे
२. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, सोलापूर
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर.
५. अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर.
६. कार्यकारी अभियंता,उजनी कालवा विभाग क्र.८, सोलापूर.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
८. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
९. जिल्हा कोषागार अधिकारी,सोलापूर
१०.जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई ३२
११.वित्त विभाग,कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय,मुंबई-३२.
१२.नियोजन विभाग,कार्यासन १४७५,मंत्रालय,मुंबई ३२.
१३.महसूल व वन विभाग,कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२
१४.महसूल व वन विभाग ,पी.ए.सी.कार्यासन ,मंत्रालय,मुंबई ३२.
१५.निवडनस्ती कार्यासन र-८,महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

*****